वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अखत्यारितील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांना (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत डिसेंबर २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधीमधून रू. ४०.५८ कोटी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाअ-२०२१/प्र.क्र.२७३/प्रशा-२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०८ मार्च, २०२२

वाचा: -

१) वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाचे पत्र क्र. संवैशिवसं/७८(ई)/१०कंसे/पुमा/हिअधि/२०२१-२२/आय-१/१४१३१/२१, दि.१०.११.२०२१
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र. पुमाअ-२०२१/प्र.क्र. २७३/प्रशा-०२, दि.१०.०२.२०२२

प्रस्तावना:-

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या संदर्भ क्र. १ वरील दिनांक १०.११.२०२१ रोजीच्या पत्रान्वये संचालनालयाच्या अधिनस्त १४ संस्थांसाठी (१०) कंत्राटी सेवा या बाबींची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशिर्षांतर्गत, (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टाखाली रु. ६९.०८ कोटी इतक्या निधीची पुरवणी मागणी सादर करण्यात आली. त्यानुसार वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या १४ शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांकरीता (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत डिसेंबर-२०२१ च्या हिवाळी अधिवेशनात सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी बाब क्र. १९४ अन्वये एकूण रु. ५४.११ कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर निधीपैकी २५% म्हणजेच रू. १३.५२ कोटी इतका निधी वित्त विभागाच्या मान्यतेने दिनांक १०.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे.

उक्त रू. ५४.११ कोटी पुरवणी मागणीच्या रकमेपैकी , वित्त विभागाने एकूण १४ संस्थांना उपलब्ध करून दिलेला उर्वरित ७५% म्हणजेच रू. ४०.५८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अखत्यारितील १४ शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांना (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत डिसेंबर-२०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर रू. ५४.११ कोटी इतक्या निधीपैकी खालील १४ संस्थांना एकूण रू. ४०,५८,३२,०००/- (रूपये चाळीस कोटी अठ्ठावन्न लाख बत्तीस हजार फक्त ) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| **अ. क्र.** | **संस्थेचे नाव** | **सांकेतांक क्रमांक** | **पुरवणी मंजूर रक्कम** | **यापूर्वी वितरीत केलेला निधी** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | सेंट जॉर्ज रुग्णालय, मुंबई | २२१०१५९२ | ९२५० | २३१३ | ६९३८ |
| २ | गोपाळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई | २२१०१६०७ | १८६२७ | ४६५७ | १३९७० |
| ३ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय औरंगाबाद | २२१०१६५२ | ८२८२० | २०७०५ | ६२११५ |
| ४ | छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर | २२१०१६६१ | ६९५५२ | १७३८७ | ५२१६४ |
| ५ | स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय रुग्णालय, अंबाजोगाई | २२१०२१७६ | २३३२० | ५८३० | १७४९० |
| ६ | स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबेजोगाई | २२१०२४५२ | ६४३६४ | १६०९१ | ४८२७३ |
| ७ | नागरी स्वास्थ केंद्र, मुंबई | २२१०३८०६ | ५९४९ | १४८७ | ४४६२ |
| ८ | आरोग्य पथक, पैठण, औरंगाबाद | २२१०३८२४ | ३७६२ | ९४१ | २८२२ |
| ९ | आरोग्य पथक, सावनेर, नागपूर | २२१०३८४२ | ७३६ | १८४ | ५५२ |
| १० | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर | २२१०F०९५ | २८३२२ | ७०८१ | २१२४२ |
| ११ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर | २२१०G२७१ | १२६१६९ | ३१५४२ | ९४६२७ |

| अ. क्र. | संस्थेचे नाव | सांकेतांक क्रमांक | पुरवणी मंजूर रक्कम | यापूर्वी वितरीत केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १२ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, गोंदिया | २२१०G३२२ | २४९४५ | ६२३६ | १८७०९ |
| १३ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव | २२१०G३३१ | ३६६८६ | ९१७२ | २७५१५ |
| १४ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव | २२१०G३४२ | ४६६०८ | ११६५२ | ३४९५६ |
| | **एकूण** | | **५४१११०** | **१३५२७८** | **४०५८३२** |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण रू. ४०,५८,३२,०००/- (रूपये चाळीस कोटी अठ्ठावन्न लाख बत्तीस हजार फक्त ) एवढा निधी अर्थसंकल्पिय निधी बीडीएस वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला असून विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७८/२०२२/व्यय-१३, दिनांक १६.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करयात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८१२२७१६२३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.03.08 13:04:42 +05'30'

(म. गि. जोगदंड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
६. सर्व संबंधित अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, नागपूर/मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.